पशुसंवर्धन विभागातील प्रशासन अधिकारी (गट-ब) संवर्गातून वरीष्ठ प्रशासन अधिकारी (गट-अ) या संवर्गात पदोन्नती देणेबाबत...

# महाराष्ट्र शासन

**कृषि व पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन आदेश क्र.पंसप्र- २०२२/प्र.क्र.२७७/पदुम-१**

हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा रोड,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दिनांक: १५/५/२०२३

**शासन आदेश :-**

पशुसंवर्धन विभागातील **प्रशासन अधिकारी (गट-ब) (एस-१५: ४१८००-१३२३००) या संवर्गातून वरीष्ठ प्रशासन अधिकारी (गट-अ) (एस-२०: ५६१००-१७७५००)** पदावर निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती देण्यात येत असून, पदोन्नतीनंतर त्यांची पदस्थापना त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या **स्तंभ क्रमांक ४** येथे नमूद ठिकाणी करण्यात येत आहे :-

| अ. क्र. | कर्मचाऱ्यांचे नाव व पदनाम | प्रवर्ग | पदोन्नतीने पदस्थापना दिलेले पद |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री. गोरख निंबा राजपूत, प्रशासन अधिकारी | खुला | वरिष्ठ प्रशासन अधिकारी (गट-अ), प्रादेशिक पशुसंवर्धन सहआयुक्त कार्यालय, गोरेगांव, मुंबई या रिक्त पदी |
| २ | श्री. बिपीन विठ्ठल सांगळे, प्रशासन अधिकारी | अनु.जमाती | वरिष्ठ प्रशासन अधिकारी (गट-अ), प्रादेशिक पशुसंवर्धन सहआयुक्त कार्यालय, छ. संभाजीनगर या रिक्त पदी |

२. मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र. २८३०६/२०१७ च्या अधिन राहून पदोन्नतीच्या कोट्यातील सर्व रिक्त पदे दि. २५/०५/२००४ रोजी स्थित सेवाज्येष्ठतेनुसार, निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात भरण्याबाबत सामान्य प्रशासन विभाग/१६-ब कार्यासनाच्या दि. ०७/०५/२०२१ रोजीच्या शासन निर्णयानुसार दिलेल्या सुचनांनुसार तसेच दि. ०७/०५/२०२१ च्या शासन निर्णयाप्रकरणी मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे आव्हान देण्यात आले असून त्यावरील अंतिम निर्णयाच्या अधीन राहुन सदर पदोन्नती देण्यात येत आहे.

३. सामान्य प्रशासन विभाग, शासन अधिसूचना दि. १४ जुलै, २०२१ अन्वये पदोन्नत होणारे अधिकारी ३० दिवसांच्या विहीत मुदतीत संबंधित पदोन्नतीच्या पदावर रुजू झाले नाहीत तर संबंधित अधिकाऱ्यांचा अनुपस्थितीचा कालावधी अकार्यदिन (dies non) म्हणून गणला जाईल. या तरतुदींच्या अनुषंगाने प्रस्तुत आदेशामधील अधिकाऱ्यांनी पदोन्नतीच्या पदावर रुजू होण्याची दक्षता घेण्यात यावी.

४. संबंधित अधिकाऱ्याने पदोन्नतीच्या पदावर हजर न होता लोकप्रतिनिधी मार्फत पदस्थापनेत बदल करण्याबाबत शासनावर दबाव आणल्यास ते म.ना.से. (शिस्त व अपील) नियम, १९७९ मधील तरतूदीनुसार शिस्तभंग विषयक कारवाईस पात्र ठरतील याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२३०५१५१७५७३४८८०१ असा आहे. हे शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MANSING UTTAMRAO PATIL

Digitally signed by MANSING UTTAMRAO PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=3ba28caa058b8cad7f6c3793fb39c98ab0287353f024576ece2b3e8f549e614b,
pseudonym=39C570EEDB4A04D696EC0B6B3139807360777302,
serialNumber=8B39952109719641926 4C059F0A083B9DB52ECFAFA693832FAEA6ED15299044C, cn=MANSING UTTAMRAO PATIL
Date: 2023.05.15 17:58:23 +05'30'

**(मानसिंग पाटील)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१) मा. मंत्री (पशुसंवर्धन) यांचे खाजगी सचिव.
२) प्रधान सचिव (पशुसंवर्धन) यांचे स्वीय सहायक
३) आयुक्त पशुसंवर्धन,महाराष्ट्र राज्य, औंध,पुणे-०७.
४) प्रादेशिक पशुसंवर्धन सहआयुक्त, मुंबई/छत्रपती संभाजीनगर
५) सहआयुक्त पशुसंवर्धन (मुख्यालय), महाराष्ट्र राज्य, पुणे.
६) महालेखापाल-१/२, (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परिक्षा) मुंबई/नागपूर.
७) सबंधित जिल्हा कोषागार अधिकारी
८) संबंधित अधिकारी......(आयुक्त पशुसंवर्धन यांचेमार्फत)
९) निवडनस्ती-१.